**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांना सार्वत्रिक निवडणूकीत भाग घेतल्यानंतर निर्वाचित सदस्याचे पद स्विकारल्यास करावयाच्या कारवाईबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र.एबावि-२०१०/प्र.क्र. १२४/का.६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ५ ऑगस्ट, २०१०

**संदर्भ :-** १. भारत सरकारच्या महिला व बाल विकास विभागाअंतर्गत मानव संसाधन विकास मंत्रालयाचे एफ नं. १-११/९४-सीडी-१, दिनांक २.०१.१९९६ चे पत्र.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००७/प्र.क्र.२९८/का.६, दिनांक २० नोव्हेंबर, २००८
३. भारत सरकारच्या महिला व बाल विकास विभाग मंत्रालयाचे, एफ नं. १९-१८/२००९-सीडी-१, दिनांक २६ मे, २०१० व एफ नं. १९-१८/२००९-सीडी-१, दिनांक ४ जून, २०१० चे पत्र.

**शासन निर्णय :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत अंगणवाडी केंद्रासाठी मंजूर असलेली अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका ही मानधनी पदे आहेत, पर्यायाने या पदांवर कार्यरत असलेले कर्मचारी मानधनी कर्मचारी आहेत, ते शासकीय कर्मचारी नसल्यामुळे संदर्भाधिन क्र.१ येथील पत्रानुसार या मानधनी कर्मचा-यांना स्थानिक स्वराज्य / पंचायत समितीच्या निवडणुका लढविण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयानुसार या मानधनी कर्मचा-यांना निर्वाचित सदस्यत्वाचे पद स्विकारल्यानंतर मानधनी पदावर गैरवर्तन केल्यास किंवा अनुपस्थित/ गैरहजर राहत असल्यास अशा मानधनी कर्मचा-याविरुध्द कार्यवाही करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. परंतु, केंद्र शासनाने संदर्भाधिन क्र.३ येथील पत्रानुसार निर्वाचित सदस्यत्वाचे पद स्विकारल्यामुळे दोन पदांची कर्तव्ये व जबाबदा-या एकाचवेळी पार पडणे शक्य होत नाही, याचा विपरित परिणाम एकात्मिक बाल विकास सेवा योजनेच्या सेवांवर होतो. त्यामुळे निर्वाचित सदस्यत्वाचे पद स्विकारलेल्या मानधनी कर्मचा-याची सेवा पुढे चालू ठेवणे योग्य नाही, असे कळविले आहे.

केंद्र शासनाच्या वरील सूचना लक्षात घेऊन संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णय याद्वारे रद्द करण्यात येत आहे. संदर्भाधिन क्र.२ येथील दिनांक २०.११.२००८ चा शासन निर्णय रद्द केल्यामुळे यापुढे अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांनी सार्वत्रिक निवडणुकीत विजयी झाल्यानंतर

निर्वाचित सदस्यत्वाचे पद स्विकारल्यानंतर अशा मानधनी कर्मचा-यांकडून मानधनी पदाचा राजीनामा घेण्यात यावा. राजीनामा न दिल्यास त्यांना मानधनी सेवेतून सक्तीने कमी करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही / -
(ज. कि. मगरे)
सह सचिव

प्रति,
सर्व विधानसभा व विधान परिषद सदस्य,
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
सर्व मंत्रालयीन विभाग.
महासंचालक, महिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई ३२
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण)
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)
बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई - १
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं.१, योगक्षेम समोर, नरीमन पॉईंट, मुंबई - २०
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई - ४
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई - १३
इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, दादर, मुंबई - २५
नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई - २१
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई - २८
महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती (कार्यासन ६)